# ॲब लिंकन

## पुस्तकांवर प्रेम करणारा मुलगा

लेखिका: के विन्टर्स,
नॅन्सी कारपेन्टर



मराठी अनुवाद:
सुशील मेन्सन

# लेखिकेचं मनोगत

*अब्राहम लिंकन*चा जन्म 1809 साली *नॅन्सी* आणि *थॉमस लिंकन* या दांपत्याकडे झाला. त्याचं औपचारिक शिक्षण एक वर्षाहूनही कमी काळ झालं. लिंकनला त्याच्या आईने वाचनासाठी प्रोत्साहन दिलं. पण तो नऊ वर्षांचा असताना *मिल्क सिकनेस* नावाच्या आजाराने नॅन्सीचा मृत्यू झाला. *व्हाईट स्नेक* नावाच्या गवताची विषारी मुळं खाल्लेल्या गायीचं दूध पिल्यामुळे हा आजार होतो. एका वर्षानंतर, थॉमसने, ॲब आणि त्याची बहीण *सारा* यांच्यासाठी सावत्र आई आणली. तिने भरपूर पुस्तकं सोबत आणल्यामुळे ॲब खुश झाला. तो मोठा झाला तेव्हा त्याने शब्दांची शक्ति ओळखली. तो भाषण, वाद-विवाद, लिखाण, सादरीकरणाचा सराव यांत तासनतास घालवू लागला.

1842 साली, ॲबने *मेरी टॉड*शी लग्न केलं. त्यांना चार मुलं झाली. *रॉबर्ट, एडी, विली* आणि *टॅड*. एडी आणि विलीचा बालपणीच मृत्यू झाला. त्यामुळे लिंकन दांपत्य खूप दु:खी झाले.

1847 साली, ॲबने कॉंग्रेसमध्ये आपला दोन वर्षांचा कार्यकाळ सुरू केला. मग राजकारण सोडून त्याने कायद्याच्या करीयरवर लक्ष केंद्रीत केलं. पण देशाची विभागणी झाली आणि गुलामगिरीचा मुद्दा ऐरणीवर आला. लिंकन गप्प राहू शकला नाही. तो सिनेटसाठी उभा राहिला आणि दोनवेळा हरला. पण त्याने हार मानली नाही. त्याच्या भाषणांचे उतारे देण्यात येऊ लागले, त्याच्या विचारांवर चर्चा होऊ लागली, तो राष्ट्रीय स्तरावर प्रसिद्ध झाला.

1860 साली, लिंकनना अमेरिकेचा सोळावा राष्ट्राध्यक्ष निवडण्यात आलं. त्यांनी नागरी युद्धाच्या वेळी देशाची सेवा केली, देश वाचवण्यासाठी युद्धाचं नेतृत्व केलं. 1 जानेवारी 1863 रोजी, त्यांनी जाहीर घोषणा करून बंडखोरी झालेल्या प्रदेशांतील गुलाम स्वतंत्र आहेत, असं जाहीर केलं.



1864 साली, लिंकन यांना पुन्हा राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडण्यात आलं. पण 14 एप्रिल 1865 रोजी, *जॉन विल्केस बूथ* या इसमाने फोर्ड थियेटरमध्ये त्यांच्यावर गोळी झाडली. पुढल्या दिवशी, लिंकन यांचा मृत्यू झाला. युद्ध सचिव *एडविन स्टॅन्टन* म्हणाले, “ते अमर आहेत.”

आज लिंकन यांचा चेहरा देशाच्या नाण्यांवर स्मितहास्य करत आहे. लिंकन स्मारकाला हजारो लोक भेट देतात. देशभक्तीच्या प्रसंगी त्यांचे शब्द ऐकायला मिळतात. लिंकन यांच्यामुळेच आज अमेरिका, संयुक्त संस्थान आहे जिथे कुणीही कुणालाही गुलाम बनवू शकत नाही. अब्राहम लिंकन यांचं पुस्तकांवरचं प्रेम, त्यांचे विचार आणि शब्द अमेरिकेला स्वातंत्र्याच्या वाटेवर घेऊन गेले आणि आजही हा प्रवास सुरू आहे.



1809 साली, केंटकी राज्यातील जंगलात एका मुलाचा जन्म झाला.

त्याची आई त्याला *अब्राहम* म्हणत असे.

त्याचं आडनाव *लिंकन* होतं.

त्याचा बिछाना मक्याच्या टरफलापासून बनला होता.

त्याचे कपडे अस्वलाच्या कातड्यापासून बनले होते.

त्याची खोली झाडांच्या ओंडक्यांपासून बनली होती.



ॲबने त्या एका खोलीच्या घरातच आपला पहिला शब्द उच्चारला, तेथील कठीण मातीच्या फरशीवर आपलं पहिलं पाऊल पुढे टाकलं. याच खोलीतली आग थंडी पळवून लावत असे आणि मकाही शिजवत असे.

चामड्याची बिजागरं असलेला या खोलीचा दरवाजा उघडझाप करत असे. एका छोट्याशा खिडकीतून ॲब बाहेरचं जग बघत असे.



ॲब दोन वर्षांचा होता तेव्हा त्याच्या कुटुंबियांनी आपलं थोडं सामान बांधून घेतलं. मग ते ॲब आणि त्याची बहीण सारा यांना घेऊन *नॉब क्रीक* येथे गेले.

*कम्बरलँड मार्ग* त्यांच्या नव्या घराजवळून जात होता. ॲबने फेरीवाले, शोधक, राजकारणी, व्यापारी, गुलाम या वाटेवरून जाताना पाहिले. ॲब मोठा झाला तसा या प्रवाशांशी गप्पा मारू लागला. ते कुठून आले, कुठे जातायत याची माहिती घेऊ लागला. त्यांचं जग आपल्या जगापेक्षा मोठं आहे, हे त्याला उमगलं. यामुळे त्याचे विचार व्यापक होऊ लागले. त्याच्या मनात अनेक प्रश्न उभे राहू लागले. तो नवनवी स्वप्नं बघू लागला.

शाळेत तो एक ते दहा संख्या शिकला. A ते Z ही अक्षरं तो दगडी कोळश्याने लिहू लागला.



दिवस-रात्र, सतत शाळेत तसंच घरात तो ही अक्षरं लिहू लागला.





तो धुळीत, बर्फात, लाकडाच्या ओंडक्यांवर अक्षरं गिरवू लागला. त्याच्यावर या अक्षरांची जणू मोहिनीच पडली. त्याला शिकायला खूप आवडू लागलं.

त्याचे आईवडील कधी शाळेत गेले नव्हते. पण संध्याकाळ झाली की सर्व कुटुंबीय आगीनजिक बसत. त्याची आई तिच्या मनात ठसलेल्या बायबलच्या कहाण्या सांगत असे. त्याचे वडील सूत कातत आणि जोक सांगून त्यांना हसवत.





अॅब सात वर्षांचा झाला तेव्हा त्याच्या कुटुंबीयांनी पुन्हा स्थलांतर केलं. डिसेंबर महिन्यात एका सकाळी, लिंकन कुटुंब निघाले. त्यांनी आपलं छोटं-मोठं सामान दोन बळकट घोड्यांवर लादलं.

पायी शंभर मैल अंतर कापून ते इंडियाना राज्यात पोहोचले.





एका फेरीबोटीतून त्यांनी ओहायो नदी पार केली. अॅबने घनदाट जंगलात झाडं-झुडपं आणि एकमेकांत गुंफलेल्या लता-वेली कापून वाट बनवण्यात वडिलांना मदत केली. अखेरीस, ते त्यांना हव्या त्या प्रदेशात पोहोचले.

*लिटल पिजन क्रिक* नदीपरिसरात त्यांना राहायला खोली मिळाली नाही. मग त्यांनी राहाण्यासाठी फांद्या, डहाळ्या आणि ओंडक्यांपासून एक तंबू बनवला. त्यांच्या तंबुच्या एका बाजूस विस्तीर्ण पसरलेलं जंगल होतं.

कुटुंबियांनी लाकडाची रास रचून ठेवली. त्यांनी आग सतत जळत राहील याकडे लक्ष दिलं. जंगलात भटकणारे हिंस्र प्राणी आगीला घाबरतात आणि दूर राहातात.

रात्री अस्वलं गुरगुरली.
लांडग्यांनी कर्कश् आवाज केले.
बिबळे गुरकावले.
ॲबला कापरं भरलं.
तो काळोख खूप भीतिदायक होता.







मग तिथे आधीपासूनच वसलेले काही लोक आले आणि त्यांनी लिंकन कुटुंबाला घर उभारण्यात मदत केली. आता ॲब आणि साराकडे स्वत:च्या घरातला पोटमाळा होता. ॲबला त्याच्या झोपण्याच्या जागी चढायला आवडत असे. पण बर्फ आणि वेगवान वारा खोलीच्या भेगांतून आत शिरून त्रास देत असत. खोलीच्या आत आलेला बर्फ भिंतींवर जमा होत असे.



एकदा ॲबने जंगलात एका टर्की पक्ष्यावर गोळी झाडली. पण फक्त एकदाच! त्यानंतर त्याने कधीच अशी शिकार केली नाही. आपण कधीही जिवंत प्राण्याला ठार मारायचं नाही, अशी त्याने शपथ घेतली.






ॲब आठ वर्षांचा झाला तेव्हा तो शेतीसाठी जमीन मोकळी करण्यात वडिलांना मदत करू लागला. तो कुऱ्हाड चालवून झाडं कापायला शिकला. पण आता त्याला पुन्हा शाळेत जावसं, पुस्तकांतून शिकावसं वाटू लागलं.

ॲब नऊ वर्षांचा झाला तेव्हा त्याचं आयुष्य अंधःकारमय झालं. *मिल्क सिकनेस* नावाच्या आजाराने त्याच्या आईचा मृत्यू झाला. ॲबने आईच्या कबरीसाठी खुंट्या कापल्या. पण त्याला एवढं गहिरं दुःख झालं होतं की तो तिचं नावदेखील उच्चारू शकला नाही.



कसंतरी एक वर्ष गेलं. त्याचे वडील नव्या पत्नीचा शोध घेऊ लागले. त्यांनी तीन मुलं असलेल्या एका विधवेशी लग्न केलं. तिचं मन खूप मोठं होतं. तिने ॲब आणि साराला आपल्या मुलांसारखंच मानलं.





आणि नव्या आईकडे पुस्तकं होती! काम पूर्ण झाल्यावर ती ॲबला पुस्तकं वाचायला देत असे. पुन्हा एकदा त्यांचं ओंडक्यांचं घर खरोखरचं घर वाटू लागलं.

नव्या आईने मुलांना पुन्हा शाळेत पाठवलं. ॲबने खूप छोटा कातड्याचा कोट आणि रॅकून (उत्तर अमेरिकेतला एक केसाळ प्राणी) ची टोपी घातली. त्याने आपली अक्षरं एका पक्ष्याच्या पिसाच्या टोकाने लिहिली.

*अब्राहम लिंकनचे हात*
*अन् लेखणी पिसाची*
*होईल तो तरबेज*
*जेव्हा मर्जी देवाची.*

ॲब लाकडी फळ्यांवर बेरीज, वजाबाकी करायला शिकला. पण त्याला वाचन करायला, मधमाशा बघायला, सूत कातायला आणि गोष्टी सांगायला सर्वात जास्त आवडत असे.



शाळा बंद असे तेव्हा ॲब इतर शेतकऱ्यांच्या शेतांवर काम करत असे. त्याचे वडील त्याची कमाई कुटुंबाच्या उदरनिर्वाहासाठी वापरत. ॲब विहिर खोदत असे, झाडं कापत असे. पण काम करतानाही त्याला शिकायची इच्छा असे.

एखादा श्रोता मिळाला की ॲब त्याला ऐकवत असे, “मला ज्या गोष्टी जाणून घ्यायच्या आहेत त्या पुस्तकांमध्ये आहेत.”











एकदा पावसाचं पाणी घराच्या छतातून गळल्यामुळे त्याने मित्राकडून उसनं आणलेलं एक पुस्तक भिजलं. मग तप्त उन्हात तीन दिवस मित्राच्या मक्याच्या शेतात काम करून त्याने त्या पुस्तकाची किंमत चुकवली.



ॲब नांगर चालवत असे तेव्हा त्याच्या मागच्या खिशात नेहमी एक पुस्तक असे. मातीतली एक रांग नांगरून झाली की तो पुस्तक काढून वाचत बसे. त्याचा घोडा पुस्तकाचं पान उलटेपर्यंत वाट पाहात थांबत असे. ॲबला पाहून शेजारी मान डोलावत आणि त्याला आळशी म्हणत.

ॲबचं पुस्तक वाचनाचं वेड शेजारी समजून घेऊ शकले नाहीत. ॲबला त्या ओसाड जंगलातून बाहेर पडावसं वाटू लागलं. लाकडं कापणं आणि नांगर चालवणं ही त्याची स्वप्नं नव्हती.

वयाच्या एकोणीसाव्या वर्षी, ॲब एक नाव खेचून नदीत घेऊन गेला. पहिल्यांदाच त्याने जंगलाबाहेरचे लोक आणि ठिकाणं पाहिली. त्याने साखळदंडात जखडलेली काळी माणसं, बायका आणि त्यांची मुलं पाहिली. त्यांच्या डोक्यावरच्या फलकावर लिहिलं होतं, लिलावासाठी.

कुऱ्हाडी, बैल यांच्यासारखंच या काळ्या लोकांचीही विक्री होते? कुणाला गुलाम करणं ॲबला अन्यायकारक वाटलं.



ॲब इलिनॉय राज्यातील *न्यू सालेम* शहरात स्थायिक झाला. या शहरात शंभरपेक्षा जास्त लोक राहात. ॲबला एक दुकान चालवायचं काम मिळालं. लोक त्याच्याबाबतीत एक गोष्ट नेहमी सांगतात. ॲबने एकदा चुकून सहा रुपये जास्त घेतले. मग *प्रामाणिक ॲब*
ते रुपये परत करण्यासाठी अनेक मैल चालत गेला.



इथेसुद्धा ॲबला मेंदूचं नव्हे तर शारीरिक सामर्थ्य सिद्ध करावं लागत असे. ॲबच्या दुकानाच्या मालकाने एका गुंडापुंडांच्या टोळीच्या नेत्यासोबत कुस्तीचा सामना आयोजित केला. अनिच्छेनेच, ॲब त्या गुंडाशी, *जॅक आर्मस्ट्रॉंग*शी, लढायला तयार झाला. काही लोक म्हणतात की ॲबने जॅकला थोड्याच वेळात जमिनीवर पाडलं. काही लोक म्हणतात की आर्मस्ट्रॉंगने एक चाल खेळून ॲबला हरवलं.









पण जेव्हा जॅकने ॲबची ताकद पाहिली तेव्हा त्याने त्याच्याशी हात मिळवला. भविष्यात ते दोघे घनिष्ठ मित्र बनले.



आगीच्या उजेडात ॲबने कुणा शिक्षकाच्या मदतीशिवाय कायद्याचा अभ्यास केला. काही काळातच तो न्यायालयात वकील बनला. ॲबने पाहिलं की त्याचे शब्द कुणा व्यक्तिला मुक्त करू शकत होते वा त्याला तुरुंगात टाकू शकत होते.
त्याने पाहिलं की शब्द लोकांची विचार करण्याची पद्धत बदलू शकतात.
जेव्हा ॲबने राजकारणात पाऊल ठेवलं, तेव्हा त्याने आपल्या शब्दांनी चुकांवर प्रहार केलेय या चुका तो सुधारू इच्छित होता. मित्रांनी त्याला सल्ला दिला की त्याने लोकप्रतिनिधी बनण्यासाठी निवडणूक लढवली पाहिजे. ॲबने आधी काँग्रेस आणि मग सिनेटसाठी प्रयत्न केले.
शेवटी त्याने देशाच्या सर्वोच्च पदासाठी निवडणूक लढवली.







अब्राहम लिंकन -

ओंडक्यांच्या घरात जन्मला.

ते सरहद्दीचं मूल होतं.

त्याला पुस्तकं आवडत असत.

तो अमेरिकेचा सोळावा अध्यक्ष बनला.

ओसाड जंगलातून तो

व्हाईट हाऊसमध्ये पोहोचला.

त्याने शब्दांची शक्ती ओळखली

आणि त्यांचा चांगला उपयोग केला.

ही गोष्ट एका अशा मुलाची आहे

ज्याला वाचन आवडत असे.

या मुलाने आपलं जग बदलून टाकलं.



समाप्त